वनीकरणाचा भरगच्च कार्यक्रम या राज्य योजनेअंतर्गत विविध वनवृत्तांकरिता सन २०१७-१८ मधील बांधील कामांचा चालू बाब प्रस्ताव.

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : एफडीएम-२०१७/प्र.क्र.९२/फ-२**

**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग**

**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,**

**दिनांक :- २३ मे, २०१७**

वाचा :- १) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दि.१८.०४.२०१७.
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.०९/३०५/२०१७-१८, दि.२०.०५.२०१७.

**प्रस्तावना :-**

राज्य योजना सन २०१७-१८ करिता "सामूहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम (४४०६ ०४९२)" या योजनेकरिता रु.१२६११.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे.

२. त्याअनुषंगाने, सन २०१७-१८ या वर्षामध्ये नागपूर, ठाणे व धुळे वनवृत्तांतर्गत प्रथम, द्वितीय, तृतीय व पंचम वर्षीय अशाप्रमाणे एकूण ३०५६ हेक्टर क्षेत्रावर बांधिल कामे करण्याकरिता रु.९७८.९९ लक्ष इतक्या रक्कमेचा चालू बाब प्रस्ताव अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.२ वरील दि.२०.०५.२०१७ रोजीच्या पत्रान्वये शासनाच्या मान्यतेसाठी सादर केला असून सदरची रक्कम वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

३. वित्त विभागाच्या दि.१८.०४.२०१७ रोजीच्या परिपत्रकान्वये सन २०१७-१८ या वर्षाकरिता भांडवली खर्च योजनांतर्गत अर्थसंकल्पित निधीच्या १०० % मर्यादेत निधी वितरणास मान्यता देण्यात आलेली आहे. त्याअनुषंगाने प्रस्तावांतर्गत मागणी केल्याप्रमाणे नागपूर, ठाणे व धुळे या वनवृत्तांमधील एकूण ३०५६ हेक्टर क्षेत्रावरील बांधील कामांकरिता **रु.९७८.९९ लक्ष (०२ मजूरी - रु.७४१.४४ लक्ष व २१ पुरवठा व सामुग्री - रु.२३७.५५ लक्ष)** इतका निधी मागील वर्षी सदर योजनेकरिता वितरित केलेल्या निधीच्या विनियोगाबाबतचे प्रमाणपत्र सादर केले जाईल या अटीच्या अधिन राहून वितरित व खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर निधी या विभागाकडून मंजूर केलेल्या प्रस्तावातील क्षेत्र / कार्यक्रम / कामे यावरच खर्च होईल व कामाची द्विरुक्ती होणार नाही आणि मंजूर कामांव्यतिरिक्त कोणत्याही नवीन बाबीवर /नवीन क्षेत्रावर/ नवीन कामांवर खर्च करण्यात येणार नाही याची

दक्षता घ्यावी. तसेच सदरहू निधी वितरित करण्यापूर्वी प्रस्तावानुसार योजनेतील निश्चित केलेल्या कामांना सक्षम अधिका-यांची तांत्रिक व प्रशासकीय मंजूरी असल्याची व त्याचबरोबर सध्या वाटप करण्यात येणा-या अनुदानातून खर्च करताना यामध्ये कोणतीही वित्तिय अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी. सदर योजनेअंतर्गत यापुर्वी घेण्यात आलेल्या रोपवनांच्या अनुषंगाने जिवंत रोपांची टक्केवारी शासनास सादर केली जाइल याची दक्षता घ्यावी. त्याचप्रमाणे, वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ वरील दि.१८.०४.२०१७ रोजीच्या शासन परिपत्रकातील अटी व शर्तींची पूर्तता करण्यात येईल याची देखिल दक्षता घ्यावी.

५. सदर योजनेवर होणारा खर्च मागणी क्र.सी-१०, प्रधानशिर्ष ४४०६ - वनीकरण व वन्यजीवन या वरील भांडवली खर्च, १०१ वनसंरक्षण, विकास व पुनर्निर्मिती, (००)(०६) सामूहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम (४४०६०४९२) या लेखा शिर्षाखाली सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यांत यावा.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ वरील दि.१८.०४.२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये आणि वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ भाग पहिला, उपविभाग-३, परिच्छेद २७ (२) अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५२४१४४३०४६२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Dattatray Laxman Thorat

Digitally signed by Dattatray Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e99493394e30f531116ee97373b411b529e251aecc25fd9c455defa0031292a7, cn=Dattatray Laxman Thorat
Date: 2017.05.24 14:54:14 +05'30'

**(डी.एल.थोरात)**
सह सचिव
महसूल व वन विभाग

**प्रति :-**
१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), नागपूर, ठाणे व धुळे
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), १/२ महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
५) सह सचिव / उप सचिव, वित्त विभाग (अर्थ-३) / (व्यय-१०), मंत्रालय, मुंबई-३२.
६) उप सचिव, नियोजन विभाग (१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.
७) ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८) निवडनस्ती, फ-२ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

विवरणपत्र - १

शासन निर्णय क्र.एफडीएम-२०१७/प्र.क्र.९२/फ-२, दि. २३.०५.२०१७

मासिक निधी विवरणपत्र सन २०१७-१८

योजनेचे नांव :- राज्य योजनेअंतर्गत सन २०१७-१८ करिता वनीकरणाचा भरगच्च कार्यक्रमांतर्गत नागपूर, ठाणे व धुळे वनवृत्तातील बांधील कामांचा रु.९७८.९९ लक्षचा प्रस्ताव (४४०६०४९२)

(रु.लाखात)

| सविस्तर शिर्ष | मे २०१७ | जून २०१७ | जुलै २०१७ | ऑगस्ट २०१७ | सप्टेंबर २०१७ | ऑक्टोबर २०१७ | नोव्हेंबर २०१७ | डिसेंबर २०१७ | जानेवारी २०१८ | फेब्रुवारी २०१८ | मार्च २०१८ | एकूण वाटप केलेली रक्कम |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ |
| ०२ मजूरी | ६०.०० | १००.०० | १००.०० | १००.०० | १००.०० | ६०.०० | ६०.०० | ५०.०० | ४०.०० | ४०.०० | ३१.४४ | **७४१.४४** |
| २१ पु.व सा. | १०.०० | ३०.०० | ३०.०० | ३०.०० | ३०.०० | २०.०० | २०.०० | २०.०० | २०.०० | १५.०० | १२.५५ | **२३७.५५** |
| **एकूण** | **७०.००** | **१३०.००** | **१३०.००** | **१३०.००** | **१३०.००** | **८०.००** | **८०.००** | **७०.००** | **६०.००** | **५५.००** | **४३.९९** | **९७८.९९** |

Dattatray Laxman Thorat

Digitally signed by Dattatray Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e99493394e30f531116ee97373b411b529e251aecc25fd9c455defa0031292a7, cn=Dattatray Laxman Thorat
Date: 2017.05.24 14:54:26 +05'30'

(डी.एल.थोरात)

सह सचिव

महसूल व वन विभाग